**पर्यावरण विषयक कार्यक्रम - ग्रुप ग्रामपंचायत रहाटोली.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईएनव्ही-२०१४/प्र.क्र.१३/०६/तां.क.३**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक: २८ ऑक्टोबर, २०१५

**वाचा :**

1. **या विभागाचा शासननिर्णय क्र. योजना-२००७/प्र.क्र.३४/तां.क.३, दिनांक ३ ऑक्टोबर, २००७**
2. **क्र. ईएनव्ही-२०१३/प्र.क्र.१३/तां.क.३, दिनांक १८ फेब्रुवारी, २०१४ रोजीचे सुकाणू समितीचे इतिवृत्त**
3. **या विभागाचा शासननिर्णय क्र. इएन्व्ही-२०१४/प्र.क्र.१३/तां.क.३, दिनांक २९ मार्च, २०१४**
4. **ग्रुप ग्रामपंचायत, रहाटोली ता. अंबरनाथ जि. ठाणे यांचे दि. ३ ऑगस्ट, २०१५ रोजीचे पत्र.**

**प्रस्तावना :**

पर्यावरण संवधनार्थ राज्याच्या स्थानिक गरजा लक्षात घेऊन लोकसहभागातून नाविण्यपूर्ण कायक्रम राबविण्यासाठी पर्यावरण विभागामार्फत सन २०१०-२०११ पासून Call for Green Ideas कार्यक्रम राबविण्यात येत आहेत. या अनुषंगाने प्राप्त प्रस्तावांपैकी सुयोग्य प्रस्ताव निवडण्यासाठी सुकाणू समितीचे गठण करण्यात आलेले आहे. बैठकी दरम्यान सुकाणू समितीने घेतलेल्या निर्णयानुसार सुयोग्य प्रस्तावांना काही अटी व शर्तींच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येतो. योजनेंतर्गत फेरी आठ साठी घेण्यात आलेल्या बैठकी दरम्यान निवड झालेल्या ग्रुप ग्रामपंचायत रहाटोली, ता. अंबरनाथ, जि. ठाणे यांनी अटींची पुर्तता न केल्याने सदर मंजूर प्रस्ताव रद्द करण्याचे शासन विचाराधिन होते.

**शासन निर्णय**

पर्यावरण संवर्धनार्थ राज्याच्या स्थानिक गरजा लक्षात घेऊन लोकसहभागातून नाविण्यपूर्ण कार्यक्रम राबविण्यासाठी मागविण्यात आलेल्या प्रस्तावांपैकी दि. १ ऑगस्ट, २०१३ ते दि. ३१ जानेवारी, २०१४ या कालावधीत प्राप्त प्रस्तावांपैकी सुकाणू समिततीने दिनांक १८ फेब्रुवारी, २०१४ रोजी आयोजित बैठकी दरम्यान घेतलेल्या निर्णयानुसार काही प्रस्तावांना सन २०१३-१४ या आर्थिक वर्षात काही अटी व शर्तींच्या अनुषंगाने निधी मंजूर करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर मंजूर प्रस्तावात माहिती व शिक्षणाद्वारे विविध पर्यावरण बाबींचा गावात जनजागृती व अंमलबजावणी मोहिम राबविण्याच्या कार्यक्रमासाठी ग्रुप ग्रामपंचायत रहाटोली, ता.अंबरनाथ, जि. ठाणे, यांची निवड करण्यात आली होती. उपरोक्त कार्यक्रम राबविण्यासाठी सदर संस्थेस रू. २०.०० लाख एवढा निधी मंजुर व मुक्त करण्यात आला होता. सदर रक्कम खर्ची करण्यापूर्वी काही अटी व शर्ती पूर्ण करणे आवश्यक होते.

२. ग्रुप ग्रामपंचायत रहाटोलीच्या प्रस्तावित योजनेनुसार Information & Education campaign, Engineering, Procurement and supervision, monitoring, solar light to all roads in the village, solid waste management in the village including agri-waste, non-biodegradable and biodegradable waste इ बाबत कामे करावयाची होती. तसेच संदर्भ क्र. २ च्या शासननिर्णयात नमूद केल्यानुसार (अट क्र.-२) रु. २,००,००० लक्ष संस्थेचा हिस्सा म्हणून अंतर्भूत करावयाचे होते. परंतू सदर

संस्थेने दि. ३ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या पत्रानुसार विभागास मंजूर प्रस्तावातील उपक्रम राबविण्यासाठी तसेच संस्थेचा हिस्सा भरण्यास असमर्थता दर्शविलेली आहे. सबब, सदर संस्थेस मंजुर केलेली प्रस्तावित योजना व निधी या शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

३. या शासननिर्णयाद्वारे ग्रामपंचायतीला वितरीत करण्यात आलेला एकूण निधी रू. २०.०० लक्ष व त्यावरील संपूर्ण व्याज असा एकत्रित निधी वित्त विभागाच्या दि.४ मार्च २०१५ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद १ मधील (२) नुसार मागणी क्र. यू-४, मुख्यलेखाशिर्ष (३४३५ १३०२) गौणशिर्ष ९१२- अखर्चित निधीची वजा वसूली असे नमूद करुन भरणा करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१११४४५३६४००४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2015.11.04 17:41:52 +05'30'

**सो.ना.बागुल**
**उपसचिव, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. संबंधित जिल्हाधिकारी
२. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
३. संबंधित ग्रामपंचायतीचे सरपंच
४. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
५. मा. मंत्री यांचे स्वीय सहायक
६. मा. राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
७. उप सचिव, (वित्त विभाग/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई,
८. उप सचिव, (नियोजन विभाग/कार्या-१४६१), मंत्रालय, मुंबई,
९. सर्व उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महा-१, महा-२, मुंबई/नागपूर,
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२. निवासी लेखा परीक्ष अधिकारी, मुंबई,
१३. संबंधित जिल्हा प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ,
१४. अपर मुख्य सचिव, पर्यावरण यांचे स्वीय सहायक,
१५. संबंधित व्यक्ती/संस्था
१६. निवडनस्ती -तां.क.३